न्यायिक अधिका-यांची अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्यास मुदतवाढ देणेबाबत -
दिनांक ०१ मार्च, २०२३ ते ३१ ऑगस्ट, २०२३ या कालावधीसाठी...

# महाराष्ट्र शासन
## विधि व न्याय विभाग
### शासन निर्णय क्रमांकः डिईसी २०२३/प्र.क्र.५०/का.१२

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: १५ मार्च, २०२३

वाचा -

१ शासन निर्णय विधि व न्याय विभाग क्रमांकः एचसीटी १००२/१२८९/(१६२)/नऊ / चार, दिनांक ०८.०९.२००३
२ शासन निर्णय वित्त विभाग क्रमांकः पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ०८ फेब्रुवारी, २०२३
३ शासन निर्णय विधि व न्याय विभाग क्रमांकः डिईसी २०२२/प्र.क्र.३४/का.१२, दिनांक ०८ सप्टेंबर, २०२२
४ महाप्रबंधक, मा.उच्च न्यायालय मुंबई यांचे पत्र क्रमांक A१२३७/६८(x)/२६५/२०२३, दिनांक १५ फेब्रुवारी, २०२३

**शासन निर्णय-**

संदर्भाधीन दिनांक ०८ सप्टेंबर, २०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये जिल्हा व सत्र न्यायालयांच्या आस्थापनेवरील न्यायिक अधिका-यांच्या १२३२ अस्थायी पदांना दिनांक २८ फेब्रुवारी, २०२३ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे. संबंधित न्यायालयांचे कामकाज सुरळीत सुरु राहण्यासाठी खाली दर्शविलेल्या तक्त्यात नमूद केल्यानुसार न्यायिक अधिका-यांच्या १२५१ अस्थायी पदांना दिनांक ०१ मार्च, २०२३ ते ३१ ऑगस्ट, २०२३ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात येत आहे.

| अ.क्र. | जिल्हा न्यायालयाचे नाव | दिनांक २८.०२.२०२३ पर्यंत मुदतवाढ दिलेली पदे | दिनांक ०१.०९.२०२२ ते २८.०२.२०२३ या कालावधीत नव्याने निर्माण केलेली पदे | पदनिर्मितीचा शासन निर्णय क्रमांक व दिनांक | दिनांक ०१.०३.२०२३ पासून ३१.०८.२०२३ पर्यंत मुदतवाढ द्यावयाची पदे |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | राज्यातील सर्व जिल्हा न्यायालये | न्यायिक अधिकारी १२३२ | १ | न्यायस्था ११२०/३७४/ प्र.क्र.९०/का.११, दिनांक १२.१०.२०२२ | १२५१ |
| | | | १ | सीआरसी २०१९/प्र.क्र. १६३/का.१२, दिनांक १८.१०.२०२२ | |
| | | | २ | न्यायस्था १२२१/६०१/ प्र.क्र.१४९/कार्यासन ११, दिनांक ०९.११.२०२२ | |
| | | | १ | न्यायस्था ०६१९/३४४/ प्र.क्र.१०८/का.११, दिनांक ०९.११.२०२२ | |
| | | | १ | न्यास्थाप १११९/८५७/ प्र.क्र.१८३/कार्यासन ११, दिनांक ०९.११.२०२२ | |
| | | | १ | न्यायस्था ०९१९/७२५/ प्र.क्र.१५६/कार्या.११, दिनांक ०९.११.२०२२ | |
| | | | १ | न्यास्थाप २०२०/प्र.क्र. ६६/कार्यासन ११, दिनांक ०९.११.२०२२ | |
| | | | २ | संकीर्ण ०११८/१५८/ प्र.क्र.३७/कार्यासन ११, दिनांक ०९.११.२०२२ | |

| अ.क्र. | जिल्हा न्यायालयाचे नाव | दिनांक २८.०२.२०२३ पर्यंत मुदतवाढ दिलेली पदे | दिनांक ०१.०९.२०२२ ते २८.०२.२०२३ या कालावधीत नव्याने निर्माण केलेली पदे | पदनिर्मितीचा शासन निर्णय क्रमांक व दिनांक | दिनांक ०१.०३.२०२३ पासून ३१.०८.२०२३ पर्यंत मुदतवाढ द्यावयाची पदे |
|---|---|---|---|---|---|
| | | | १ | सीआरसी २०१९/प्र.क्र. २०४/का.१२, दिनांक ११.११.२०२२ | |
| | | | १ | सीआरसी २११७/प्र.क्र. १७४/का.१२, दिनांक १५.११.२०२२ | |
| | | | १ | ग्रामन्या २०२१/प्र.क्र. ८/का.१२, दिनांक १२.०१.२०२३ | |
| | | | १ | न्यायस्था ०१२०/०८/ प्र.क्र.७/का-११, दिनांक १६.०१.२०२३ | |
| | | | १ | सीआरसी २०१७/प्र.क्र. ३६०/का.१२, दिनांक ०२.०२.२०२३ | |
| | | | १ | सीआरसी २०१८/प्र.क्र. १८०/का.१२, दिनांक ०२.०२.२०२३ | |
| | | | १ | ग्रामन्या २०२१/प्र.क्र. १२/का.१२, दिनांक २१.०२.२०२३ | |
| | | | १ | ग्रामन्या २०२०/प्र.क्र. १११/का.१२, दिनांक २१.०२.२०२३ | |
| | | | १ | ग्रामन्या २०१९/प्र.क्र. २३२/ का.१२, दिनांक २१.०२.२०२३ | |

२. विधि व न्याय विभाग कार्यासन ९ यांचेकडून मुदतवाढ मिळणारी न्यायिक अधिका-यांची पदे या शासन निर्णयातून वगळली आहेत. तसेच, सदस्य मोटार अपघात दावा प्राधिकरण या २ पदांचा समावेश उपरोक्त मुदतवाढ देण्यात येत असलेल्या १२३० पदांमध्ये आहे.

३. यासाठी येणारा खर्च "२०१४-न्यायदान" या मुख्य लेखाशीर्षाखाली “१०५ (दोन) जिल्हा व सत्र न्यायाधिश", “१०५-(तीन) दिवाणी न्यायाधिश" व "१०८ फौजदारी न्यायालये" यांपैकी योग्य त्या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्या लेखाशीर्षाखालील संबंधित वित्तिय वर्षासाठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ नुसार वित्तिय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग तीन मधील अ.क्र. ४ चा परिच्छेद क्र.२७(२) (क) अन्वये तसेच, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ०८ फेब्रुवारी, २०२३ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारांन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३१५१६०९१४२६१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NITIN V JIWANE

Digitally signed by NITIN V JIWANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=eaafa52b8f5b995089773c42d6ed2475cd061a337b724d471400fbcfb074e051, pseudonym=00D295F198C67FDB7031897066C5804DA623172E, serialNumber=38DA45FC182DE9210D4220CD41371018A4D6F00892E5D1478CBA8413AFB06C03, cn=NITIN V JIWANE
Date: 2023.03.15 16:13:45 +05'30'

**( नि. वि. जिवने )**

**विधि सल्लागार-नि-सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महाप्रबंधक, मा.उच्च न्यायालय मुंबई,
२. प्रबंधक (निरीक्षणे-१), मा.उच्च न्यायालय मुंबई,
३. प्रबंधक, मा.उच्च न्यायालय मुंबई, खंडपीठ नागपूर, औरंगाबाद
४. महालेखापाल (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता)-एक/दोन, महाराष्ट्र मुंबई / नागपूर,
५. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश, जिल्हा न्यायालय ठाणे, रायगड, रत्नागिरी, सिंधुदूर्ग, नाशिक, धुळे, जळगाव, नंदुरबार, अहमदनगर, पुणे, सातारा, सांगली, सोलापूर, कोल्हापूर, औरंगाबाद, जालना, बीड, परभणी, नांदेड, लातूर, उस्मानाबाद, अमरावती, अकोला, वाशिम, यवतमाळ, बुलढाणा, वर्धा, नागपूर, भंडारा, चंद्रपूर, गडचिरोली, गोंदीया, लघुवाद न्यायालय मुंबई, नगर दिवाणी व सत्र न्यायालय मुंबई, मुख्य महानगर दंडाधिकारी मुंबई

६. जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे, रायगड, रत्नागिरी, सिंधुदूर्ग, नाशिक, धुळे, जळगाव, नंदुरबार, अहमदनगर, पुणे, सातारा, सांगली, सोलापूर, कोल्हापूर, औरंगाबाद, जालना, बीड, परभणी, नांदेड, लातूर, उस्मानाबाद, अमरावती, अकोला, वाशिम, यवतमाळ, बुलढाणा, वर्धा, नागपूर, भंडारा, चंद्रपूर, गडचिरोली, गोंदीया,

७. उप जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे, रायगड, रत्नागिरी, सिंधुदूर्ग, नाशिक, धुळे, जळगाव, नंदुरबार, अहमदनगर, पुणे, सातारा, सांगली, सोलापूर, कोल्हापूर, औरंगाबाद, जालना, बीड, परभणी, नांदेड, लातूर, उस्मानाबाद, अमरावती, अकोला, वाशिम, यवतमाळ, बुलढाणा, वर्धा, नागपूर, भंडारा, चंद्रपूर, गडचिरोली, गोंदीया,

८. सह सचिव, विधि व न्याय विभाग, नागपूर, औरंगाबाद,

९. वित्त विभाग, आ.पु.क., व्यय-५, अर्थसंकल्प ११, मंत्रालय, मुंबई

१०.गृह विभाग, परिवहन-५, मंत्रालय, मुंबई

११.विधि व न्याय विभाग, कार्यासन २३ व २४,

१२.निवडनस्ती (का.१२).